**श्री. दत्ता अर्जुन तुमराम, शिक्षणाधिकारी (प्राथमिक) जि.प. वाशिम, यांना माध्यमिक शिक्षक या पदावर रुजू होण्याकरिता शिक्षणाधिकारी पदावरून कार्यमुक्त करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांक: कार्यमू ३८१८/प्र. क्र.२६०/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०७ जानेवारी, २०१८

<u>वाचा</u>:- १) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. ससेप्र ४३०२/प्र.क्र.७०/प्रशा-२ दिनांक ०८ ऑगस्ट, २०१३

२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन शुध्दीपत्रक, क्र. ससेप्र ४३०२/प्र.क्र.७०/प्रशा-२ दिनांक १३ ऑगस्ट, २०१३

३) अप्पर आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती यांचे आदेश क्र. आस्था-२०१८/प्रक्र./का-१(क)/५०४९/२०१८ दिनांक ०५ ऑक्टोबर, २०१८

४) श्री. दत्ता अर्जून तुमराम, यांचे दिनांक १५ नोव्हेंबर, २०१८ रोजीचे पत्र

५) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य पुणे यांचे पत्र क्र. आस्था-अ/म.शि.से. गट-अ पदो./ टे.क्र. १०१/२०१८, दिनांक ३१.१२.२०१८

**कार्यालयीन आदेश-**

शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या संदर्भ क्रमांक १ अन्वये श्री. दत्ता अर्जुन तुमराम, यांची शिक्षणाधिकारी व तत्सम, महाराष्ट्र शिक्षण सेवा (प्रशासन शाखा) गट-अ पदावर नियुक्ती करण्यात आली होती. श्री. दत्ता अर्जुन तुमराम हे सध्या शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जि.प. वाशिम या पदावर कार्यरत आहेत. श्री. तुमराम हे शिक्षणाधिकारी पदावर रुजू होण्यापूर्वी आदिवासी विकास विभागांतर्गत माध्यमिक शिक्षक या पदावर कार्यरत होते. श्री. तुमराम यांनी शिक्षणाधिकारी पदावरून माध्यमिक शिक्षक या मूळ पदावर परत जाण्याकरीता मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई खंडपीठ, औरंगाबाद येथे मूळ अर्ज क्र. ६९०/२०१७ दाखल केला होता. मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने त्यांची दिनांक १६/०८/२०१८ रोजीच्या आदेशानुसार अतिरिक्त आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती यांच्या नियंत्रणाखाली शाळेमध्ये माध्यमिक शिक्षक म्हणून श्री. तुमराम यांना रुजू करण्याचे आदेश दिले आहेत. त्यानुसार अप्पर आयुक्त आदिवासी विकास अमरावती यांनी त्यांच्या दिनांक ०५/१०/२०१८ रोजीच्या आदेशानुसार प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पांढरकवडा, जि. यवतमाळ यांच्या अधिनस्त शासकीय माध्यमिक आश्रम शाळा, झटाळा, ता. घाटंजी जि. यवतमाळ येथे इतर

विषयाच्या माध्यमिक शिक्षकाच्या रिक्त जागेवर श्री. दत्ता अर्जुन तुमराम यांना पदस्थापना देण्याबाबतचे आदेश निर्गमित केले आहेत.

२. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पांढरकवडा, जि. यवतमाळ यांच्या अधिनस्त शासकीय माध्यमिक आश्रम शाळा, झटाळा, ता. घाटंजी जि. यवतमाळ येथे इतर विषयाच्या माध्यमिक शिक्षकाच्या रिक्त पदावर रुजू होण्याकरीता श्री. दत्ता अर्जुन तुमराम यांना शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जि.प. वाशिम या पदावरून कार्यमुक्त करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. श्री. दत्ता अर्जुन तुमराम यांचा शिक्षणाधिकारी पदावरील परिविक्षाधीन कालावधी अद्याप संपुष्टात आणला नसल्यामुळे शिक्षणाधिकारी व तत्सम, महाराष्ट्र शिक्षण सेवा (प्रशासन शाखा) गट-अ या पदावर त्यांचा कोणताही धारणाधिकार राहणार नाही.

४. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१९०१०७१७३३५४३६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Pralhad Ate

Digitally signed by Ravindra Pralhad Ate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sport Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd5fc4fce5f6732e6657dca817ae6ee619a55d170d3c93eff53c3ca69d1a772d, serialNumber=eaa37af2edb5809b000f33d26328f6cdac80ee32afdac3f68b5821d14e41dffa, cn=Ravindra Pralhad Ate
Date: 2019.01.08 11:12:43 +05'30'

**( र. प्र. आटे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त (शिक्षण), शिक्षण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) अप्पर आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, अमरावती
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद वाशिम /यवतमाळ
४) सर्व शिक्षण संचालक
५) विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती
६) शिक्षणाधिकारी (प्राथ./माध्य.), जि.प. वाशिम
७) जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम / यवतमाळ
८) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पांढरकवडा, जि. यवतमाळ
९) संबंधित अधिकारी (आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालयामार्फत)

**प्रत माहितीसाठी,**

१) मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे स्वीय सहायक.
२) अप्पर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक
३) निवडनस्ती, प्रशा-२.